महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील "वैद्यकीय अधिकारी गट-अ" यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः परिवि-२०२०/प्र.क्र.१७१/सेवा-३**
दहावा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय,मुंबई- ४०० ००१.
तारीख: ०८ ऑक्टोबर,२०२०.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः परिवि-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६.
२) शासन शुध्दिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः परिवि-२७१८/प्र.क्र.२/आठ, दिनांक ७ फेब्रुवारी, २०१८.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः मभाप-१०८७/१४/सीआर-२/८७/२०, दिनांक ३० डिसेंबर, १९८७.
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः हिंभाप-१९७६-२८, दिनांक १० जून १९७६.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील "वैद्यकीय अधिकारी गट-अ" या पदावर दोन वर्षांच्या परिविक्षा कालावधीकरीता सदर शासन आदेशात असलेल्या खालील तक्त्यात नमूद वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या नियुक्त्या करण्यात आल्या आहेत. या नियुक्या सन २०११ मध्ये स्वतंत्र मंडळाने केलेल्या शिफारशीनुसार "वैद्यकीय अधिकारी गट-अ"या पदावर शासन सेवेत प्रथम नियुक्तीने करण्यात आलेल्या आहेत.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या वाचा येथे नमूद शासन निर्णयान्वये शासन सेवेतील अधिकारी/ कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना पारित करण्यात आल्या असून,वैद्यकीय अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ या पदावर पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांचा दोन वर्षांचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेला असल्याने या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता सदर परिच्छेदात नमूद तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील "वैद्यकीय अधिकारी गट-अ" यांनी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केलेल्या असल्याने त्यांचा परिविक्षाधीन कालावधी या परिच्छेदातील तक्त्यात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्र.५ मध्ये नमूद दिनांकास (म.नं.) समाप्त करण्यात येत आहे. तसेच त्यांची सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक (म.पू.) स्तंभ क्र.७ मध्ये नमूद करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | कार्यालय | वै.अ.पदावरील रुजू दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी पुढे ढकलल्याची कारणे | वै.अ.पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |

| अ.क्र. | नाव | कार्यालय | वै.अ.पदावरील रुजू दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी पुढे ढकलल्याची कारणे | वै.अ.पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | डॉ. मिलींद माधवराव सुर्यवंशी | सामान्य रुग्णालय, चंद्रपुर | दि.१४.११.२०१४ | दि.२२.११.२०१६ | ९ दिवस रजा | दि.२३.११.२०१६ |
| २ | डॉ. मंगला युवराज तुंगार | प्राथमिक आरोग्य केंद्र शिंदे, जि. नाशिक | दि.२७.०८.२०११ | दि.२६.०८.२०१३ | निरंक | दि.२७.०८.२०१३ |
| ३ | डॉ. विजय जनार्दनराव सिरसमकर | ग्रामीण रुग्णालय पालम जि. परभणी | दि.१२.१०.२०१३ | दि.११.१०.२०१५ | निरंक | दि.१२.१०.२०१५ |
| ४ | डॉ. मोहम्मद शाहेद मोहम्मद ताहेर | प्रा. आ. केंद्र निघोज, जि. अहमदनगर | दि.२९.०३.२०११ | दि.२८.०३.२०१३ | निरंक | दि.२९.०३.२०१३ |
| ५ | डॉ. विजय सिताराम बलकार | उपजिल्हा रुग्णालय शेगांव, जि. बुलढाणा | दि.१७.०२.२०११ | दि.१६.०२.२०१३ | निरंक | दि.१७.०२.२०१३ |
| ६ | डॉ.वैभव प्रभाकर कौलखेडे | उपजिल्हा रुग्णालय दर्यापूर जि. अमरावती | दि.१०.०२.२०११ | दि.०९.०२.२०१३ | निरंक | दि.१०.०२.२०१३ |
| ७ | डॉ. संजय सुखा चव्हाण | प्रा.आ.के. पानवडोद जि. औरंगाबाद | दि.०८.०२.२०११ | दि.२३.०४.२०१३ | ७५ दिवस रजा | दि.२४.०४.२०१३ |
| ८ | डॉ. अरुणा कोंडिंबा पोहरे | उपजिल्हा रुग्णालय गोकुंदा जि.नांदेड | दि.०४.०२.२०११ | दि.०३.०२.२०१३ | निरंक | दि.०४.०२.२०१३ |
| ९ | डॉ. संदीप बाळासाहेब पुंड | प्रा.आ.केंद्र आढळगांव जि. अहमदनगर | दि.०९.०३.२०११ | दि.०८.०३.२०१३ | निरंक | दि.०९.०३.२०१३ |

२. आयुक्त, आरोग्य सेवा व कु.क.तथा अभियान संचालक, रा.आ.अ., मुंबई यांना कळविण्यात येते की, उक्त वैद्यकीय अधिकारी यांच्या पुढील वेतनवाढी नियमानुसार व विहित तरतुदीनुसार मुक्त करण्याच्या अनुषंगाने तात्काळ उचित कार्यवाही करावी.

३. तथापि, A) उक्त तक्त्यातील अ.क्र.३ येथील डॉ. विजय जनार्दनराव सिरसमकर हे हिंदी भाषा परीक्षा उशीराने उत्तीर्ण झालेले असल्याने त्यांना हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून दि.१५.०६.२०१५ पासून सूट मिळालेली आहे. सबब उक्त तक्त्यात त्यांच्या नावासमोर नमूद केल्यानुसार जरी त्यांचा परिविक्षा कालावधी दि.११.१०.२०१५ रोजी समाप्त होवून त्यांची त्या पदावरील सेवा नियमितरित्या जरी दि.१२.१०.२०१५ पासून पुढे चालू होत असली तरी, त्यांच्या वेतनवाढी दि.१५.०६.२०१५ पर्यंत रोखून त्या दिनांकापासून त्यांना वेतनवाढी देय होईल. B) उक्त तक्त्यातील अ.क्र.५ येथील डॉ. विजय सिताराम बलकार हे मराठी भाषा परीक्षा उशीराने उत्तीर्ण झालेले असल्याने त्यांना मराठी भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून दि.२०.०१.२०१९ पासून सूट मिळालेली आहे. सबब उक्त तक्त्यात त्यांच्या नावासमोर नमूद केल्यानुसार जरी त्यांचा परिविक्षा कालावधी दि.१६.०२.२०१३ रोजी समाप्त होवून त्यांची त्या पदावरील सेवा नियमितरित्या जरी दि.१७.०२.२०१३ पासून पुढे चालू होत असली तरी, त्यांच्या वेतनवाढी दि.२०.०१.२०१९ पर्यंत रोखून त्या दिनांकापासून त्यांना वेतनवाढी देय होईल. C) उक्त तक्त्यातील अ.क्र.९ येथील डॉ. संदीप बाळासाहेब पुंड हे मराठी भाषा परीक्षा उशीराने उत्तीर्ण झालेले असल्याने त्यांना मराठी भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून दि.०५.०८.२०१८ पासून सूट मिळालेली आहे. सबब उक्त तक्त्यात त्यांच्या नावासमोर नमूद केल्यानुसार जरी त्यांचा परिविक्षा कालावधी दि.०८.०३.२०१३ रोजी समाप्त होवून त्यांची त्या पदावरील सेवा नियमितरित्या जरी दि.०९.०३.२०१३ पासून पुढे चालू होत असली तरी, त्यांच्या वेतनवाढी दि.०५.०८.२०१८ पर्यंत रोखून त्या दिनांकापासून त्यांना वेतनवाढी देय होईल. सदर A), B) व C) येथील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या वेतनवाढी वाचा क्र.३ व ४ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार रोखल्यानंतर तद्नंतर भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यास सूट मिळाल्याच्या दिनांकापासून सदर अधिकाऱ्यांना वेतनवाढी देय झाल्यानंतर त्यापुढील सर्व वेतनवाढी त्यांची कोणतीही वेतनवाढ रोखून धरण्यात आली नव्हती असे मानून त्यांना मिळतील. मात्र वेतनवाढ रोखल्यामुळे त्यांना ज्या प्रत्यक्ष वेतनास मुकावे लागेल त्याची थकबाकी मिळण्याचा हक्क त्यांना राहणार नाही.

४. उक्त तक्त्यातील A) अ.क्र.१ येथील डॉ. मिलिंद माधवराव सुर्यवंशी यांची वैद्यकीय अधिकारी या पदावर दि.१९.०१.२०११ च्या शासननिर्णयान्वये प्रथम नियुक्ती झालेली असली तरी त्या आदेशानुसार डॉ.सुर्यवंशी हे दि.०७.०२.२०११ रोजी रुजु झाले हाते. तद्नंतर ते अनधिकृत गैरहजर होते.दि.३१.१०.२०१४ च्या शासन आदेशान्वये ते दि.१४.११.२०१४ रोजी रुजु झाले आहेत. सबब, त्यांचा परिविक्षा कालावधी हा दि.१४.११.२०१४ पासुन सुरु होत असल्याने डॉ.सुर्यवंशी या वैद्यकीय अधिकाऱ्याची ज्येष्ठता बाधित होणार असुन ते त्यांची मूळ ज्येष्ठता गमाविल्यामुळे त्यांची ज्येष्ठता त्यांच्या नियुक्ती आदेशानुसार ग्राह्य न धरता त्यांच्या रुजू दिनांकापासून म्हणजे दि.१४.११.२०१४ पासुन ग्राह्य धरण्यात येत आहे. B) अ.क्र.३ येथील डॉ. विजय जनार्धनराव सिरसमकर यांची वैद्यकीय अधिकारी या पदावर दि.१९.०१.२०११ च्या शासननिर्णयान्वये प्रथम नियुक्ती झालेली असली तरी त्या शासननिर्णयातील अटी, शर्ती व तरतुदीनुसार ते त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी विहित वेळेत एक महिन्याच्या आत म्हणजे दि.१७.०२.२०११ पुर्वी रुजू झाले होते.तथापि, तद्नंतर ते शासनाची परवानगी न घेता पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी दि.०४.०७.२०११ ते दि.११.१०.२०१३ पर्यंत अनधिकृत गैरहजर होते.तद्नंतर त्यांना संचालनालयाने विनंती केल्यानुसार दि.०९.१०.२०१३ च्या शासन आदेशान्वये त्यांच्या अनधिकृत गैरहजेरीनंतर रुजु करुन घेण्यात आले असुन त्यानुसार ते दि.१२.१०.२०१३ रोजी रुजु झाले आहेत. त्यामुळे तसेच

संचालनालयाने त्यांच्या दि.०२.०५.२०१८ च्या पत्रात नमूद केल्यानुसार त्यांचा परिविक्षा कालावधी दि.१२.१०.२०१३ पासुन ते दि.११.१०.२०१५ असा राहणार आहे.सबब डॉ. विजय जनार्धनराव सिरसमकर या वैद्यकीय अधिकाऱ्यांची ज्येष्ठता बाधित होणार असुन ते त्यांची मूळ ज्येष्ठता गमाविल्यामुळे त्यांची ज्येष्ठता त्यांच्या दि.१९.०१.२०११ या नियुक्ती आदेशानुसार ग्राह्य न धरता दि.०९.१०.२०१३ च्या शासन आदेशान्वये त्यांच्या अनधिकृत गैरहजेरीनंतर रुजू झालेल्या दि.१२.१०.२०१३ या दिनांकापासून ग्राह्य धरण्यात येत आहे. तसेच C) अ.क्र.४ येथील डॉ. मोहम्मद शाहेर मोहम्मद ताहेर यांची वैद्यकीय अधिकारी या पदावर दि.१९.०१.२०११ च्या शासननिर्णयान्वये प्रथम नियुक्ती झालेली असली तरी त्या शासननिर्णयातील अटी, शर्ती व तरतुदीनुसार ते त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी विहित वेळेत एक महिन्याच्या आत म्हणजे दि.१८.०२.२०११ पुर्वी रुजू होणे क्रमप्राप्त होते.तथापि, ते दि.२९.०३.२०११ या दिनांकास वैद्यकीय अधिकारी या पदावर प्रथम नियुक्तीने उशीराने रुजू झालेले आहेत.सबब डॉ. मोहम्मद शाहेर मोहम्मद ताहेर या वैद्यकीय अधिकाऱ्यांची ज्येष्ठता बाधित होणार असुन ते त्यांची मूळ ज्येष्ठता गमाविल्यामुळे त्यांची ज्येष्ठता त्यांच्या नियुक्ती आदेशानुसार ग्राह्य न धरता त्यांच्या रुजू दिनांकापासून ग्राह्य धरण्यात येत आहे. तसेच उक्त तक्त्यातील अ.क्र.९ येथील डॉ. संदीप बाळासाहेब पुंड यांची वैद्यकीय अधिकारी या पदावर दि.१९.०१.२०११ च्या शासननिर्णयान्वये प्रथम नियुक्ती झालेली असली तरी त्या शासननिर्णयातील अटी, शर्ती व तरतुदीनुसार ते त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी विहित वेळेत एक महिन्याच्या आत म्हणजे दि.१८.०२.२०११ पुर्वी रुजू होणे क्रमप्राप्त होते.तथापि, ते दि.०९.०३.२०११ या दिनांकास वैद्यकीय अधिकारी या पदावर प्रथम नियुक्तीने उशीराने रुजू झालेले आहेत.सबब डॉ. संदीप बाळासाहेब पुंड या वैद्यकीय अधिकाऱ्यांची ज्येष्ठता बाधित होणार असुन ते त्यांची मूळ ज्येष्ठता गमाविल्यामुळे त्यांची ज्येष्ठता त्यांच्या नियुक्ती आदेशानुसार ग्राह्य न धरता त्यांच्या रुजू दिनांकापासून ग्राह्य धरण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश वाचा येथे नमूद शासन निर्णय/शुध्दीपत्रक यांमधील तरतुदींन्वये व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय परिवी-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१००८१४३६५६१६१७ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UMESH DHARMA RATHOD

Digitally signed by UMESH DHARMA RATHOD
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9d2847c085fbb527b4b95e71ae1457bfffcbb1147b4cb91423f372da97117d29, postalCode=400001, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=3667a98f6d3e5f0ed5652697d674c2eb05d852dd34f87fda6a20696c80787981, ou=PUBLIC HEALTH DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=UMESH DHARMA RATHOD
Date: 2020.10.08 17:50:16 +05'30'

**(डॉ.उमेश ध.राठोड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, आरोग्य सेवा व कु.क.तथा संचालक, रा.आ.अ, आरोग्य भवन,मुंबई.

२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)- १, महाराष्ट्र, मुंबई.

३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)- २, महाराष्ट्र, नागपूर.

४. महालेखापाल, लेखापरीक्षा- १, महाराष्ट्र, मुंबई.

५. महालेखापाल, लेखापरीक्षा- २, महाराष्ट्र, नागपूर.

६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई

७. उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ (नागपूर, नाशिक, औरंगाबाद, अकोला व लातूर)

८. जिल्हा शल्य चिकित्सक (चंद्रपूर, नाशिक, परभणी, अहमदनगर, बुलढाणा, अमरावती, औरंगाबाद व नांदेड)

९. जिल्हा आरोग्य अधिकारी,जिल्हा परिषद (चंद्रपूर, नाशिक, परभणी, अहमदनगर, बुलढाणा, अमरावती, औरंगाबाद व नांदेड)

१०. जिल्हा कोषागार अधिकारी (चंद्रपूर, नाशिक, परभणी, अहमदनगर, बुलढाणा, अमरावती, औरंगाबाद व नांदेड)

११. संबंधित वैद्यकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांच्यामार्फत.

१२. निवडनस्ती (कार्यासन, सेवा-३).